जिल्हा व सत्र न्यायालय,नाशिक यांच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अस्थायी ०३२५/९२/प्र.क्र.५७/कार्यासन-११**
पाचवा मजला, मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १३ मार्च, २०२५.

<u>पहा:</u> १. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.असंक १००१/प्र.क्र.२९/२००१, वित्तीय सुधारणा, दि.१०.०९.२००१.
२. शासन निर्णय क्र. अस्थायी ०२२४/प्र.क्र.५७/कार्यासन ११, दि.२०.०९.२०२४.
३. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क्र.,दि.०३.०३.२०२५.
४. जिल्हा व सत्र न्यायालय,नाशिक यांचे पत्र जा.क्र.EST/३२/९३७९/२०२४,दि.२४.१२.२०२४.

**प्रस्तावना :**

जिल्हा व सत्र न्यायालय, नाशिक यांच्या आस्थापनेवरील २१९ अस्थायी पदांना संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये दि. ०१.०९.२०२४ ते दि. २८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. त्यानंतर त्यांच्या आस्थापनेवर जिल्हा न्यायालय व दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर, नाशिकरोड स्थापित झाल्याने ३८ अस्थायी पदांची वाढ झालेली आहे.

संदर्भाधीन अ.क्र.३ येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच, यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु, ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुषंगाने जिल्हा व सत्र न्यायालय,नाशिक यांच्या आस्थापनेवरील २५७ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

जिल्हा व सत्र न्यायालय, नाशिक यांच्या आस्थापनेवरील खालील तक्यात नमूद केलेली २५७ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ या कालावधीत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | अधीक्षक | ०६ |
| २ | लघुलेखक ग्रेड-१ | ०५ |
| ३ | लघुलेखक ग्रेड-२ | ०३ |
| ४ | लघुलेखक ग्रेड-३ | १२ |

| | | |
|---|---|---|
| ५ | सहायक अधीक्षक | १८ |
| ६ | वरिष्ठ लिपीक | ३९ |
| ७ | कनिष्ठ लिपीक | १०५ |
| ८ | संच चालक | ०१ |
| ९ | मुख्य बेलिफ | ०५ |
| १० | बेलिफ | ३२ |
| ११ | वाहनचालक | ०२ |
| १२ | पुस्तक बांधणीकार | ०१ |
| १३ | शिपाई - पहारेकरी | २४ |
| १४ | सफाईगार | ०४ |
| | एकुण पदे | २५७ |

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.जे-१, २०१४, न्यायदान, १०५- दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (२०१४ ०१७२ ) (दत्तमत) (अनिवार्य) ०१-वेतन या लेखाशीर्षाखालील सन २०२५-२०२६ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ आपुक, दि.०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१३१४५१२४९११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

HEMANGI AJIT SHETYE

Digitally signed by HEMANGI AJIT SHETYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=a80fef4908844f3f0e391754221ba7b421d28c86653344150a5e31030c791f4b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7328C41D6A5210C49CCE931861626D508AE4537D7BB43F92AC6D5796595AADB8, cn=HEMANGI AJIT SHETYE
Date: 2025.03.13 14:53:29 +05'30'

**(हेमांगी शेट्ये )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा न्यायालय, जि.नाशिक,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
४. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
५. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. नाशिक,
६. विधि व न्याय विभाग, कार्या२३/२०-, मंत्रालय, मुंबई,
७. वित्त विभाग, व्यय ५/आ.पु.कक्ष/अर्थसंकल्प ११, मंत्रालय, मुंबई,

************************************